**डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खत आयात करुन राज्यातील शेतकऱ्यांना पुरवठा करण्यासाठी महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाने राष्ट्रीयकृत बँकेकडून घ्यावयाच्या रु.२७० कोटी ऐवजी रु.१५० कोटी <u>इतक्या कर्जास शासन हमी मंजूर करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**

वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

शासन निर्णय क्रमांकः- शाहमी-१००९/कृवपदुम/प्र.क्र.४/अर्थबळ.

दिनांक : ३० नोव्हेंबर,२००९.

**<u>वाचा</u>:-** १) शासन निर्णय क्रमांकः- शाहमी-१००९/कृवपदुम/प्र.क्र.४४/अर्थबळ. दिनांक ३ ऑगस्ट, २००९.

२) शासन शुध्दिपत्रक क्रमांकः- शाहमी-१००९/कृवपदुम/प्र.क्र.४४/अर्थबळ. दिनांक ७ सप्टेंबर,२००९.

३) शासन निर्णय क्रमांकः- शाहमी-१००९/कृवपदुम/प्र.क्र.४४/अर्थबळ.दिनांक १८ नोव्हेंबर,२००९.

४) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ मर्या., मुंबई यांचे सं.क्र.खते/हमी शुल्क/२००९/६८९१, दिनांक २० नोव्हेंबर, २००९.

**<u>प्रस्तावनाः</u>-**

राज्यातील मागणीच्या तुलनेत खताच्या पुरवठ्यातील तूट भरुन काढण्यासाठी केंद्र शासनाच्या निर्देशानुसार केंद्र शासनाने नियुक्त केलेल्या मे.इंडियन पोटॅश लिमिटेड, मे.इफको लि.व आरसीएफ या खत कंपन्याकडून **डी.ए.पी./एम.ओ.पी/युरीया** खत आयात करुन ते राज्यातील शेतकऱ्यांना पुरवठा करण्यासाठी महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाची **नोडल एजंन्सी** म्हणून नियुक्ती करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. याप्रमाणे डी.ए.पी. १.८४ लाख मे. टन, एम.ओ.पी. १ लाख मे.टन व युरिया १ लाख मे.टन खत असे एकूण ३.८४ लाख मे. टन खत आयात मागणी करण्याकरिता महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामडंळाला रु.२७०.०० कोटी (रुपये दोनशे सत्तर कोटी फक्त) चे कर्ज राष्ट्रीयकृत बँकेकडून (निविदा प्रक्रियेनुसार) घेण्याकरिता वरील संदर्भ १ तद्अनुषंगिक २ मधील शासन आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली शासन हमी, उक्त संदर्भाधीन ३ मधील शासन आदेशान्वये रद्द करण्यात आलेली होती. मात्र, राज्यात बऱ्याच ठिकाणी चांगला पाऊस झाल्याने व ऊसाला चांगला भाव आल्याने, शेतकऱ्यांचा कल ऊस लागवडीकडे अधिक वाढत असल्याने, खताची मागणी वाढेल. शेतकऱ्यांना खताचा पुरवठा करण्यासाठी कर्ज घेण्याची गरज असल्याचे महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांनी कळविल्यामुळे व कृषी व पदुम विभागाने प्रस्तावित केल्यानुसार उक्त शासन निर्णयान्वये रद्द केलेली शासन हमी पुर्नजिवित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

( कृ. मा. प. )

**शासन निर्णयः-**

प्रस्तुत प्रकरणी महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावाप्रमाणे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः-शाहमी-१००९/कृवपदुम/प्र.क्र.४४/अर्थबळ, दिनांक३ ऑगस्ट,२००९ आणि शासन शुध्दिपत्रक क्रमांकः-शाहमी-१००९/कृवपदुम/प्र.क्र.४४/अर्थबळ. दिनांक ७ सप्टेंबर, २००९ अन्वये मंजूर करण्यात आलेली रु.२७० कोटी कर्जाची शासन हमी, विभागाने शासन हमी दिल्यापासून ते हमी रद्द करणेपर्यंतच्या कालावधीचे हमी शुल्क तात्काळ शासन तिजोरीत जमा करावे या अटीच्या अधिन राहून शासन हमी रद्द करण्याकरिता शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः-शाहमी-१००९/कृवपदुम/प्र.क्र.४४/अर्थबळ. दिनांक १८ नोव्हेंबर,२००९ चे आदेश हा शासन निर्णय निर्गमित करण्याच्या दिनांकापासून मागे घेण्यात येत आहेत. तसेच उक्त शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या रु.२७० कोटी (रुपये दोनशे सत्तर कोटी ) कर्जाच्या शासन हमी ऐवजी आता रु.१५० कोटी (रुपये एकशे पन्नास कोटी) एवढया कर्जासाठी संदर्भाधीन १ व २ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती व शासन हमी दिल्यापासून ते हमीच्या रकमेतील बदलाच्या दिनांकापर्यंतच्या कालावधीचे हमीशुल्क तात्काळ शासन तिजोरीत जमा करावे या अटीच्या अधिन राहून शासन हमी मंजूर करण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय कृषी व पदुम विभागाच्या नस्ती क्र.राखते-३७०८/प्र.क्र.१९९/१७-अे वरील प्रस्तावास अनुसरुन, त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(गो. डो. तायडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) प्रधान सचिव, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२) व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मर्या.मुंबई.
३) वित्त विभाग (साउ /ऋण व हमी संनियंत्रण कक्ष/ व्यय-१ ) मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
५) महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर.
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी.
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८) व्यवस्थापकीय संचालक, संबंधित राष्ट्रीयकृत बँक, मुंबई.
९) निवड नस्ती - अर्थबळ.